आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन.**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०४/का-६.**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २ फेब्रुवारी,२०२२.

**वाचा -**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.

२) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, समक्रमांक,दि.८.०४.२०२१,दि.१२.०५.२०२१, दि.२.०६.२०२१ दि.१६.०७.२०२१, दि.१७.०९.२०२१, दि.३०.०९.२०२१, दि.७.१०.२०२१ व दि.२८.१०.२०२१.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पुरक-२०२१ /प्र.क्र.८५/ अर्थ-३, दि.१.११.२०२१.

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.पुरक-२९२०/प्र.क्र.७५/ अर्थसंकल्प.

**प्रस्तावना:-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहाय्यक अनुदान-(२२०२ १९०१), २) अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८) व ३)सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला अर्थसहाय्य (२२०२ एच ९७३) या योजनांतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता सन २०२१-२२ या वर्षात एकूण रु.६२५०.०० लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्यात आलेला आहे. या योजनांतर्गत वेतनाकरीता डिसेंबर, २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे वाढीव तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

यास अनुसरून शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित निधी शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२१-२२ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे खालीलप्रमाणे एकुण रू.६०३७.३३ लाख (अक्षरी रूपये साठ कोटी सदतीस लाख तेहेतीस हजार फक्त) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशीर्ष | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२१-२२ | यापुर्वी वितरीत तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (२२०२ १९०१), ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | ८४५८.१८ | ४५००.०० | ३९५८.१८ |

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशीर्ष | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२१-२२ | यापुर्वी वितरीत तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८ ), ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | ४७०.१६ | २५०.०० | २२०.१६ |
| ३ | सैनिकी शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३), ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | ३३५८.९९ | १५००.०० | १८५८.९९ |
| | **एकुण** | **१२२८७.३३** | **६२५०.००** | **६०३७.३३** |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण रू.६०३७.३३ लाख इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७/व्यय-१४, दि.२८.०१.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१२५७४५८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.02.03 18:12:58 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. उपसचिव/कक्ष अधिकारी (का-११),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.